**महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेअंतर्गत साधनसामग्री (Material) चे दर निश्चित करण्याबाबत समितीची स्थापना.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्र. मग्रारो-२०१०/ प्र.क्र. २/ रोहयो- १० अ**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२**
**दिनांक : २८ डिसेंबर, २०११**

वाचा: १) शासन निर्णय नियोजन विभाग क्र.मग्रारो २०१०/प्र.क्र.२/रोहयो - १० अ, दि. १३/१०/२०११

**प्रस्तावना**

महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेअंतर्गत कुशल कामावरील खर्च भागविण्यासाठी अग्रिम देण्याबाबत व साधनसामुग्रीचे दराबाबत मागदर्शक सूचना संदर्भाधीन शासन निर्णय दि. १३ ऑक्टोबर, २०११ देण्यात आला असून याकरीता मागदर्शन आवश्यक असल्यास तालुका पातळीवर ग्रामपंचायत / पंचायत समिती यांच्यासाठी व यंत्रणांसाठी समिती नेमण्याचे आदेशीत करण्यात आले आहे. सदर समितीने महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेअंतर्गत घेण्यात येणाऱ्या विविध कामांसाठी आवश्यक असलेल्या साधनसामुग्रीची खरेदी करण्यास क्षेत्रिय अधिकाऱ्यांना अडचणी येत असल्यामुळे उपरोक्त साहित्याचे दर निश्चित करण्याबाबत शासन खालील आदेश देत आहे.

**शासन निर्णय** :-

महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजने अंतर्गत साधनसामुग्रीचे दर, यंत्रसामग्री व वहानांच्या भाड्याचे दर DSR च्या दराप्रमाणे असल्याची दक्षता घेऊन त्या कार्यपध्दतीत अडचणी उद्‌भवल्यास अथवा त्यासंदर्भात मागदर्शन आवश्यक असल्यास त्यासाठी तालुका पातळीवर खालील प्रमाणे दोन समित्या नेमण्यास संदर्भाधीन दि. १३ ऑक्टोबर, २०११ च्या शासन निर्णयान्वये आदेशीत करण्यात आले आहे.

| **१) ग्रामपंचायत/पंचायत समिती यांच्यासाठी** | **२) यंत्रणांसाठी** |
|---|---|
| गटविकास अधिकारी - संयोजक | तहसिलदार - संयोजक |
| उपअभियंता (कामे), जिल्हा परिषद | संबंधित यंत्रणांचे तालुकास्तरीय तांत्रिक अधिकारी |
| उपअभियंता (पाटबंधारे), जिल्हा परिषद | |

२ . तेव्हा सदर समितीने महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेअंतर्गत तालुका /पंचायत समिती स्तरावर घेण्यात येणाऱ्या विविध कामांसाठी आवश्यक असलेल्या साहित्याचे (Material) दर निश्चित करण्यास शासन मान्यता देत आहे. उदारणार्थ - रेती, विटा, टॅक्टरचे भाडे, सुरुंग इ.

३. सदर समितीने खालील बाबी विचारत घेऊन साधारणत: ३० ते ४० आवश्यक वस्तू / साहित्याचे दर सोबतच्या विहित **विविरण पत्र - अ** मध्ये घोषित करावेत.

अ) स्थानिक परिस्थिती / बाजार भाव विचारात घेणे.

ब) स्थानिक रित्या जाहिरात करुन शक्यतो TIN No. धारक विक्रेत्यांकडून वस्तूंच्या / साहित्याच्या दराची माहिती घेणे. दि. १/४/२०१२ पासून मात्र फक्त TIN No. धारक विक्रेत्यांकडून / पुरवठाधारकांकडून साहित्याच्या दराची माहिती घेणे आवश्यक राहिल.

क) विविध विभागांचे प्रचलित DSR विचारात घेणे.

४. सदर समितीने साहित्याच्या दराची फक्त शिफारस करावी. मात्र **वस्तूची खरेदी करु नये.**

५. समितीने निश्चित केलेले दर एका वर्षासाठी अनुज्ञेय राहतील.

६. तालुका /पंचायत समिती स्तरावरील दुर्गम, अति दुर्गम व डोंगराळ भागाकरीता वाहतूक खर्च अथवा तत्सम अतिरिक्त खर्च विचाारात घेवून आवश्याक असल्यास समिती दरामध्ये वाढ करू शकते.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०१११२२८११५१५५१२५५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(व्ही.गिरीराज)**
**प्रधान सचिव**

प्रति,

१) मा. राज्यपालांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई-४०००३२
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
४) मा.मंत्री/राज्यमंत्री (रोहयो) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई-४०००३२
५) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे स्वीय सहायक,
६) प्रधान सचिव (रोहयो), नियोजन विभाग,मंत्रालय,मुंबई-४०००३२
७) प्रधान सचिव, (कृषी) कृषी व पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई-४०००३२
८) सर्व विभागीय आयुक्त,
९) आयुक्त, कृषी, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०) सर्व जिल्हाधिकारी, (मुंबई व मुंबई उपनगर वगळून)
११) संचालक, फलोत्पादन, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२) मुख्य अभियंता व सह सचिव (रोहयो)
१३) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
१४) सर्व विशेष कार्यकारी अधिकारी व उप विकास आयुक्त (रोहयो)
१५) सर्व उप जिल्हाधिकारी (रोहयो)
१६) मुख्य अभियंता,लघुपाटबंधारे विभाग (स्थानिक स्तर), पुणे.
१७) सर्व विभागीय कृषी सहसंचालक,

१८) समिती अधिकारी,कार्यासन ड-७, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन,
१९) सर्व उपसचिव/ अवर सचिव/कक्ष अधिकारी,(मग्रारोहयो) नियोजन विभाग,मंत्रालय,
२०) कक्ष अधिकारी, रोहयो-१, सारसंग्रह
२१) निवड नस्ती,कार्यासन रोहयो-१० अ,नियोजन विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.

## विवरण पत्र अ

**तालुका / पंचायत समितीचे नाव:**
**जिल्हा :**

महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेअंतर्गत घेण्यात येणाऱ्या विविध कामांसाठी आवश्यक असलेल्या साहित्याचे / वस्तूंचे दर

| अनु क्रमांक | साहित्याचे नाव | परिमाण | रक्कम (रुपये) |
|---|---|---|---|
| | | | |
| | | | |
| | | | |